राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम
निधी वितरण- सन २०१५-१६
सर्वसाधारण निधी (General-I)

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अंनिका-२०१५/नि.वि./प्र.क्र.८४/आरोग्य-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख : १ जुलै, २०१५

वाचा -

1) **केंद्र शासनाच्या आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालयाचे आदेश F.No.T.१२०१२/३७/ २०१४-BC, दि. ४ फेब्रुवारी, २०१५.**
2) **सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/ अंनिकाकक्ष८अ/GIA/१८६८/१५, दि.२४.०४.२०१५.**

प्रस्तावना -

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना सन १९७६ सालापासून सुरु करण्यात आली आहे. या योजनेसाठी केंद्र शासनाकडून १००% अनुदान देण्यात येत होते. केंद्र शासनाच्या आदेशानुसार सन २०१३-१४ पासून राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम हा राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राबविण्यात येत आहे. सदर कार्यक्रमाकरिता सर्वसाधारण (General), अनुसूचित जाती विशेष घटक योजना (SCSP) व जनजाती (आदिवासी) क्षेत्र उपयोजना (STSP) यासाठी केंद्र शासन ७५% व राज्य शासन २५% याप्रमाणे अनुदान देण्यात येत आहे. सदर उपयोजनांतर्गत प्राप्त निधी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्याकरिता प्रत्येक उपयोजनांची केंद्र हिस्सा व राज्य हिश्शाची स्वतंत्र लेखाशिर्षे घेण्यात आली आहेत. राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमाच्या सन २०१४-१५ च्या वार्षिक कृती आराखाडयानुसार केंद्र शासनाने वरील संदर्भ क्र. १ येथील आदेशान्वये रु.३६४.२७ लक्ष इतका सर्वसाधारण निधी (General) राज्याचा एकत्रित निधीत जमा केला आहे. सदर केंद्र हिश्शाचा रु.३६४.२७ लक्ष व त्यावरील राज्य हिस्सा २५% प्रमाणे देय असलेला रु.१२१.४२ लक्ष असे एकूण रु.४८५.६९ लक्ष इतका निधी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्प अंदाजात (२२१० एफ २६४-केंद्र हिस्सा) सर्वसाधारण निधी या लेखाशिर्षाखाली रु.९४४.८३ लक्ष इतकी आर्थिक तरतूद करण्यात आली आहे. तसेच त्यावर २५% राज्य हिस्सा यासाठी (२२१० एफ २७३-राज्य हिस्सा) या लेखाशिर्षाखाली रु.१६६.९२ लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून केंद्र शासनाने आदेश क्र. F.No.T.12012/37/ 2014-BC, दि. ४ फेब्रुवारी, २०१५ अन्वये सर्वसाधारण निधी म्हणून राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेले रु.३६४.२७ लक्ष (केंद्र हिस्सा) व त्यावरील २५% प्रमाणे देय असलेले राज्य हिश्शाचे रु.१२१.४२ लक्ष असे एकूण मिळून **रु.४८५.६९ लक्ष (अक्षरी रुपये चारशे पंच्याऐंशी लक्ष एकोण सत्तर हजार फक्त)** इतका निधी कार्यकम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर- १
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०६ - सार्वजनिक आरोग्य,
८०० - इतर खर्च
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५ टक्के)
(०१) (२९) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम (राअंनिका)
(२२१० एफ २६४) (केंद्र हिस्सा)

केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा २५ टक्के)
**(०१)** (३०) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम (राअंनिका)
(२२१० एफ २७३) (राज्य हिस्सा)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत वितरीत केलेल्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी सह संचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर निधीशी संबंधीत देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी रक्कम संबंधीत कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावी.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभाग, व्यय-१३ शाखेच्या अनौ.सं.क्र.२५९/२०१५/व्यय-१३, दि.२२.०६.२०१५ व अर्थोपाय शाखेच्या अनौ.सं.क्र.२१/२०१५-१६/अर्थोपाय, दि.१०.०६.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११८१९२८५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.07.02 17:54:35 +05'30'

**( ज. सु. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग-अंनिका) , मुंबई.

४) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५) प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालयनालय, मुंबई.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) नियोजन विभाग (कार्यासन- १४७२), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (व्यय-१३) (अर्थसंकल्प-९)/(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१२) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा)/(लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (आरोग्य-५).